सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या निवासी इमारतीच्या बांधकामासाठी व उपकामांसाठी सहाय्यक अनुदान वितरित करण्याबाबत...
लेखाशीर्ष २५१५ १२५६

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः योजना-२०२०/प्र.क्र.७८/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
दिनांक: १६ जुलै, २०२०

**वाचा :-**

**शासन ज्ञापन, ग्राम विकास विभाग क्रमांकः** योजना- २०१९/प्र.क्र.१५५/बांध-४, दिनांक १३ जानेवारी, २०२०.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा मधील दिनांक १३ जानेवारी, २०२० रोजीच्या शासन ज्ञापनान्वये, रू.६००.०० लक्ष इतका निधी जिल्हा परिषद/पंचायत समिती निवासी इमारतीच्या बांधकामासाठी सहायक अनुदान या योजनेच्या ICICI बँकेतील बचत खात्यात वर्ग करण्यात आला होता. सदर योजनेचा शिल्लक निधी ग्राम विकास विभागाच्या बँक ऑफ महाराष्ट्र मधील चालू खात्यात वर्ग करण्यात आला आहे. सद्यस्थितीत बँक ऑफ महाराष्ट्र मधील चालू खात्यात सदर योजनेचा रू.६००.०० लक्ष इतका निधी वितरणासाठी शिल्लक आहे.

०२. जिल्हा परिषद व पंचायत समितीच्या निवासी इमारतींच्या बांधकामांसाठी/उपकामांसाठी बँक ऑफ महाराष्ट्र मधील चालू खात्यात शिल्लक असलेल्या रू.६००.०० लक्ष (अक्षरी रू.सहा कोटी फक्त) इतके सहायक अनुदान मंजूर करून, पुढीलप्रमाणे जिल्हा परिषदेच्या संबंधीत मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदरचे अनुदान बँक ऑफ महाराष्ट्र मधील चालू खात्यातून संबंधित जिल्हा परिषदांना त्यांचे सदर योजनेच्या राष्ट्रीयीकृत बँकेतील खात्यात RTGS/NEFT/Cheque द्वारे वितरीत करण्यात येत आहे. सदर जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या निवासी इमारत बांधकामास/उपकामांस विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून निधी खर्च करण्यात यावा.

-: निधी वितरणाचे विवरणपत्र :-

| लेखाशीर्ष २५१५ १२५६ खाली निवासी इमारत बांधकामासाठी/उपकामांसाठी वितरीत करण्यात आलेला निधी | | |
|---|---|---|
| अ.क्र. | जिल्हा परिषद/पंचायत समितीचे नाव | वितरीत करण्यात आलेला निधी (रू.लाखांत) |
| १ | २ | ३ |
| (अ) मराठवाडा विभाग | | |
| १ | पं.स.सेलु (जि.परभणी) अधिकारी-कर्मचारी निवासस्थान | ४८.३० |
| २ | पं.स.परभणी (जि.परभणी) अधि-कर्मचारी निवासस्थान | ५०.०० |
| ३ | पं.स.निलंगा (जि.लातूर) अधि-कर्मचारी निवासस्थान | ६१.७० |
| ४ | पं.स.केज (जि.बीड), सभापती, अधि-कर्मचारी निवासस्थान | ७०.०० |
| ५ | पं.स.माजलगांव (जि.बीड), सभापती, अधि-कर्मचारी निवासस्थान | ७०.०० |
| ६ | पं.स. अंबाजोगाई (जि.बीड), सभापती, अधि-कर्मचारी निवासस्थान | ८०.०० |
| ७ | पं.स. परळी (जि.बीड), सभापती, अधि-कर्मचारी निवासस्थान | ७०.०० |
| ८ | पं.स. गेवराई (जि.बीड), सभापती, अधि-कर्मचारी निवासस्थान | ७०.०० |
| ९ | पं.स. पाटोदा (जि.बीड), सभापती, अधि-कर्मचारी निवासस्थान | ८०.०० |
| **एकुण (अ)** | **९** | **६००.००** |

**०३.** वरील कामांकरीता होणारा खर्च मागणी क्र.एल-३, “२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायत राज (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारत बांधण्यासाठी जिल्हा परिषदांना सहायक अनुदान (कार्यक्रम) (२५१५ १२५६) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२०२१ साठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**०४.** वरील विवरणपत्रामध्ये ज्या कामाच्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करुन दिलेला आहे, तो त्याच कामावर तात्काळ खर्च करुन, सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल, संबंधीत विभागीय आयुक्त यांना पाठवून, त्याची प्रत या विभागाकडे आठ दिवसांत पाठविण्याची जबाबदारी संबधित मुख्य वित्त व लेखा अधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. तसेच सदर अनुदानाच्या विनियोजना संबधी महालेखापाल कार्यालयास

पाठविण्यात आलेल्या उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत शासनास मुदतीत पाठविण्यात न आल्यास, संबधित जिल्हा परिषदेच्या कामावर पुढील सहायक अनुदान वितरीत केले जाणार नाही, याची कृपया नोंद घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०७१५०७११२१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2020.07.16 13:52:24 +05'30'

**(रा. ना. सवने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (ग्रा.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अतिरिक्त मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई- ३२.
७. विभागीय आयुक्त, विभागीय कार्यालय, सर्व.
८. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा, महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी, लातूर व बीड.
१०. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी, लातूर व बीड.
११. कार्यकारी अभियंता (बांधकाम) जिल्हा परिषद, परभणी, लातूर व बीड.
१२. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी, लातूर व बीड.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी, लातूर व बीड.
१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१५. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,जिल्हा परिषद, परभणी, लातूर व बीड.
१६. वित्त विभाग, (व्यय १५/ अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१७. नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबइ ४०० ०३२.
१८. कार्यासन, वित्त-१, वित्त-७ व योजना-७, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१९. निवड नस्ती कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-०१.